**महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा गट-अ व महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ मधील अध्यापकांच्या तंत्रशिक्षण संचालनालयातील प्रशासकीय पदावर तदर्थ व्यवस्थेने केलेल्या बदल्यांना एक वर्षाची मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.- उवतंशि/तांशि-१/४३/११/७५/२०१३,**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ०५ ऑगस्ट, २०१५

पहा :-

१) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. टिईएम-३३९३/(५५३६)/तांशि-१ दि. २२/११/१९९३.

२) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.टिईडी-८५०२/१२४६०/(६०५/०२)/तांशि-५, दि. ०९/०९/२००४.

३) उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.-उवतंशि/तांशि-१/४३/११/७५/२०१३, दि. ३०/१०/२०१३

४) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, मुंबई दि. १४/११/२०१४ चे पत्रे.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार तंत्र शिक्षण संचालनालयाच्या आस्थापनेवरील महाराष्ट्र अभियांत्रिकी महाविद्यालयीन शिक्षक सेवा गट-अ व महाराष्ट्र तंत्रनिकेतन शिक्षक सेवा गट-अ मधील अध्यापकांच्या तंत्रशिक्षण संचालनालयातील प्रशासकीय पदावर खालील अधिकाऱ्यांच्या तदर्थ व्यवस्थेने संदर्भ क्र. ०३ येथील आदेशान्वये एक वर्षाकरीता बदलीने सेवा उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत. त्यानुसार संदर्भ क्र. ०३ येथील आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्यांचा कालावधी दि. २९/१०/२०१४ रोजी मुदत संपुष्ठात आला आहे.

त्यानुसार दि. ३०/१०/२०१३ च्या आदेशान्वये तंत्रशिक्षण संचालनालयातील प्रशासकीय पदावर तदर्थ व्यवस्थेने एक वर्षाकरीता बदलीने सेवा उपलब्ध करुन दिलेल्या खालील अधिकाऱ्यांच्या बदल्यांना दि. ३०/१०/२०१३ च्या शासन निर्णयातील अटीं व शर्तींच्या अधिन राहून दि. ३०/१०/२०१४ पासून पुढे एक वर्षाची मुदतवाढ देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अध्यापकांचे नाव, पदनाम व कार्यरत संस्था | बदलीचे ठिकाण | बदलीचे कारण |
|---|---|---|---|
| १ | डॉ. अशोक तुकाराम पिसे, प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड | तंत्रशिक्षण संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई येथे रिक्त असलेल्या उपसंचालक पदावर | प्रशासकीय |
| २ | डॉ. राजिव व्ही. शेटकर, सहयोगी प्राध्यापक, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद | तंत्रशिक्षण संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई येथे रिक्त असलेल्या सहायक संचालक पदावर | प्रशासकीय |
| ३ | श्री. आर.व्ही. जाधव, विभागप्रमुख, शासकीय तंत्रनिकेतन, पेण | महाराष्ट्र तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई येथे रिक्त असलेल्या उपसचिव (तांत्रिक) पदावर | प्रशासकीय |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०५१६४१०७५६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Kiran Ashok Jadhav

Digitally signed by Kiran Ashok Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=520f8fcee847f1c0c636dc41dd071c509eb7d5ce1c25c32732dfea00eba9b134, cn=Kiran Ashok Jadhav
Date: 2015.08.05 16:43:27 +05'30'

**( किरण जाधव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

संबंधीत अध्यापक, (संचालनालयामार्फत)

**प्रत-:**

१) मा. मुख्यमंत्री, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई
२) मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
३) मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई
४) प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई.

६) संचालक, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई

७) सर्व सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालये, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

८) संबधित संस्थाप्रमुख, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)

९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) /(लेखा परीक्षा), महाराष्ट्र - १/२, मुंबई/नागपूर.

१०) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी,

११) अधिधान व लेखा अधिकारी,

१२) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील कार्यासन क्र : तांशि-२,३,४,५,६ व ७

१३) निवड नस्ती (तांशि-१)